**वार्षिक योजना-२०१७-१८:**
**राज्य योजनेअंतर्गत निसर्ग पर्यटन या योजने अंतर्गत सोनसळ येथील श्री. चौरंगीनाथ या निसर्ग पर्यटन स्थळावर कार्यरत असलेल्या ६ अतिरिक्त पदांच्या वेतन व भत्यांचा खर्च भागविण्यासाठी अनुदान वितरित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : निसप-२०१७/प्र.क्र.८२/फ-५**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- ३० मे, २०१७

__वाचा__:- १) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक- पदनि-२०१६/१६/आ.पु.क , दि.१० फेब्रुवारी, २०१७.
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक- निसप-२०१७/प्र.क्र.२/फ-५, दिनांक २७ फेब्रुवारी, २०१७.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), म.रा. नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/ पी/यो/चाबाप्र./प्र.क्र.१३३/(१३-१४)/२८२/२०१७-१८,दि.१८ मे,२०१७
४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/ प्र.क्र.७५/अर्थ-३ दि.१८ एप्रिल, २०१७

__प्रस्तावना :-__

निसर्ग पर्यटन स्थळांचा विकास या योजनेतंर्गत सांगली जिल्हयातील कडेगांव तालुक्यातील मौजे सोनसळ येथील चौरंगीनाथ या पर्यटन स्थळांचा विकास करण्यासाठी वनरक्षकांची २ व पहारेक-याची ४ असे एकूण ६ अतिरिक्त पदांच्या निर्मितीस मंजूरी देण्यात आली आहे.

शासन निर्णय संदर्भ क्र. १ दिनांक १०/०२/२०१७ व संदर्भ क्र. २ येथील दिनांक २७/०२/२०१७ अन्वये सदरहू पदांना दिनांक १/३/२०१७ ते ३०/०९/२०१७ या कालावधीकरिता पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्यात आली आहे. या पदांच्या वेतन भत्त्यावरील खर्च भागविण्यासाठी अनुदान वितरीत करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन आहे.

__शासन निर्णय :__

प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या वरील प्रस्तावास अनुसरुन वनरक्षकांची २ व पहारेकऱ्यांची ४ अशी एकूण ६ पदे निर्माण करण्यास संदर्भ क्र. १ व २ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

मौजे सोनसळ अंतर्गत श्रीचौरंगीनाथ, जि. सांगली येथील वन विभागाच्या अखत्यारीतील निसर्ग पर्यटन स्थळाच्या देखभालीसाठी मंजूर केलेल्या पदांच्या वेतन व भत्याचा खर्च भागविण्याकरिता खाली प्रमाणे उद्दिष्ठ निहाय अनुदान मंजूर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | उद्दीष्ट | सन २०१७-१८ मधील अर्थसंकल्पीय तरतूद (रु. लाखात) | वित्त विभाग शासन परिपत्रक दि.१८/०४/२०१७ नुसार ८०% मर्यादेत वितरीत करण्यात येत असलेला निधी (रु. लाखात) |
|---|---|---|---|
| १ | ०१ वेतन | ९.९८ | रु. ७.९८ |
| २ | ११ प्रवास खर्च | १.०० | रु. ०.८० |
| | एकूण | १०.९८ | रु. ८.७८ |

सदरहू खर्च सन २०१७-१८ करिता लेखाशिर्ष २४०६ वनिकरण व वन्यजीवन राज्य योजनातंर्गत योजना पंचवार्षिक योजनांतर्गत (०२)(०६) इको टूरिझम (राज्य) (२४०६ २२९५) अंतर्गत उपलब्ध होणा-या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक १८/०४/२०१७ च्या परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०५३०१२५८२४६७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil N. Dhas

Digitally signed by Anil N. Dhas
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=699d21cc89897191099434d443603426329c81b1b292ed2d168c892811118cc7, cn=Anil N. Dhas
Date: 2017.05.30 13:03:29 +05'30'

(अनिल धस)
कक्ष अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास)/(कार्मिक), म.रा.नागपूर.
३) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), कोल्हापूर.
४) उप विभागीय वनाधिकारी, सांगली.
५) नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई.
६) वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन मंत्रालय, मुंबई.
७) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
८) कोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय, सांगली/कोल्हापूर
९) निवडनस्ती, फ-५ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.